महाराष्ट्र स्वयंअर्थसहाय्यित शाळा (स्थापना व विनियमन) अधिनियम २०१२ अंतर्गत नवीन शाळा स्थापन करण्याची व विद्यमान शाळेचा दर्जावाढ करण्याची कार्यपद्धती सुटसुटीत करणे व राज्यात फक्त 'A' ग्रेड च्या शाळा संचालित होतील याचे धोरण निश्चीत करणे बाबत.

# महाराष्ट्र शासन

## शालेय शिक्षण व क्रीडा विभाग

**शासन निर्णय क्रमांकः एसएफएस-१०१६/प्र.क्र.१४२/एसएम- २**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: १४ जुलै, २०१७

**प्रस्तावना :**

आमच्या मुलांना सर्वोत्तम शिक्षण (Our Children deserve the best) ही उक्ती कृतीत आणण्यासाठी गुणवत्तापुर्ण शिक्षण देण्याची उत्तम रुढ प्रक्रिया राज्यात राबविणे आवश्यक आहे. प्रत्येक मुलाला प्रत्येक प्रकारच्या एकापेक्षा अधिक शाळेचा पर्याय उपलब्ध करुन देणे जेणेकरुन त्यांना सर्वोत्तम शाळा निवडण्याचा अधिकार राहील, हा याचा महत्वाचा भाग आहे. असे केल्याने कमी पटसंख्येच्या शाळा हया अकार्यक्षम शाळा आहेत, असेही सिध्द होईल. म्हणुन अकार्यक्षम शाळा, कमी पटसंख्येच्या शाळा यांची निंदणी करून जास्त पटसंख्येच्या गुणवत्ता पुर्ण शाळा राज्यात उभारण्यासाठी स्पर्धात्मक युग निर्माण करणे आवश्यक आहे. स्पर्धात्मक युग निर्माण करण्यासाठी राज्यात मागेल त्याला शाळा ही संकल्पना राबविणे प्रस्तावित आहे.

२. राज्यात महाराष्ट्र स्वयंअर्थसहाय्यीत शाळा (स्थापना व विनियमन) अधिनियम २०१२, लागु आहे. सदर कायद्यांतर्गत प्रत्येक शैक्षणिक वर्षाकरिता नवीन शाळा स्थापन करणे त्याचप्रमाणे विद्यमान शाळेचा दर्जावाढ करणे याची परवानगी देण्याकरिता इच्छुक संस्थांकडून On Line पध्दतीने प्रस्ताव मागविण्यात येतात. त्यासाठी सर्व संबंधितांना अवगत होण्यासाठी स्थानिक मुख्य वृत्तपत्रांच्या माध्यमातून जाहीरातीद्वारे कळविण्यात येते अशी सध्याची कार्यपध्दती अस्तित्वात आहे. तथापि सदर प्रक्रियेमध्ये फक्त शाळा मंजुर करुन घेण्याकडे खाजगी शैक्षणिक संस्थाचा कल असल्याचे दिसुन येत आहे. गुणवत्तापुर्ण निकोप स्पर्धा वाढीस लागण्यासाठी, अकार्यक्षम व रोडवलेल्या पटसंख्येच्या शाळा वेळीच बंद करण्यासाठी युडायस कोड घेऊन सरल प्रणालीच्या माध्यमातून अकार्यक्षम शाळांचे संनियंत्रण करणे गरजेचे आहे. याकरीता शाळेसाठी येणाऱ्या प्रत्येक अर्जाला युडायस कोड घेणे अगत्याचे करणे व प्रचलित शाळा परवानगी प्रक्रियेत बदल करून कार्यपध्दती अधिक सुलभ होण्यासाठी सुधारित कार्यपद्धती अवलंबविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :**

**स्वयंअर्थसहाय्यित कायदयातंर्गत परवानगी देण्यासाठी सुधारीत कार्यपध्दती :**

१. **संगणक प्रणाली विकसित करणे** - यापुढे राज्यात कोणतीही शाळा युडायस कोड शिवाय राहणार नाही. त्याकरिता अस्तित्वात असलेल्या सर्व शाळांना युडायस कोड घेण्यास प्रोत्साहित / बाध्य करण्यात येईल. तसेच, स्वयंअर्थसहाय्य कायदयातंर्गत

परवानगीसाठी येणाऱ्या सर्व अर्जांना प्रथमत: युडायस कोड देण्यात यावा. याकरिता संगणक प्रणाली विकसित करण्यात येईल व त्यात खालील टप्प्यांचा पाठपुरावा करण्याची सुविधा ठेवण्यात येईल.

१.१) प्रत्येक अर्जाला युडायस कोड मिळणे

१.२) या कार्यपध्दतीत सुचविल्याप्रमाणे अर्जाची सद्य परिस्थिती पाहता येणे.

१.३) अर्जाला मान्यता मिळणे म्हणजे LOI मिळण्याची स्थिती

१.४) त्रुटी असल्यास ते संबंधितांना कळणे

१.५) त्रुटी पूर्तता ऑनलाईन होणे

१.६) प्रथम मान्यता मिळण्याची स्थिती

१.७) १८ महिन्याच्या आत प्रथम मान्यता न घेता आल्यास (म्हणजेच शाळा सुरु न झाल्यास) LOI रद्द करण्याची स्थिती

१.८) प्रथम मान्यता मिळालेल्या शाळा न्युपाच्या युडायस मध्ये दिसणे

१.८.१) शाळेतील पटसंख्येचा वार्षिक ट्रेंड बघणे

१.८.२) शाळा सिध्दी मध्ये शाळेच्या ग्रेडचा वार्षिक ट्रेंड बघणे

**२. अर्ज / प्रस्ताव मागविण्याची कार्यपध्दती :**

२.१) ऑनलाईन प्रणालीत प्राप्त झालेल्या अर्जांची तपासणी करण्याकरिता राज्यस्तरावर आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे **राज्यस्तरीय छाननी समिती** गठित करण्यात येत आहे.

१) आयुक्त (शिक्षण) ------------------------------ अध्यक्ष

२) शिक्षण संचालक (प्राथ.) ------------------------ सदस्य

३) शिक्षण संचालक (माध्य. व उच्च माध्य.) ----------- सदस्य सचिव

४) नामनिर्देशित --------------------------------सदस्य (दोन)

नामनिर्देशित सदस्यांची नियुक्ती आयुक्त (शिक्षण), पुणे यांनी करावी. त्यापैकी एक सदस्य हा UDISE कोड संबंधित कामकाज व IT क्षेत्रातील तज्ञ असावा व सदर सदस्याची नियुक्ती राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांच्या सहमतीने / सल्ल्याने करण्यात यावी.

२.२) शासन निर्णय क्रमांक एचएससी-१८१२/(३२३/१२/उमाशि-१ दिनांक १७ जुन, २०१३ अन्वये निर्माण करण्यात आलेल्या जिल्हास्तरीय समिती व राज्यस्तरीय समिती सदर शासन निर्णयान्वये रद्द करण्यात येत आहेत.

२.३) **राज्यस्तरीय छाननी समिती :-** राज्यस्तरीय समितीने राज्यातील सर्व प्रस्तावांची छाननी करुन त्यांच्या अभिप्रायासह / शिफारशीसह राज्यातील महिन्यातून प्राप्त झालेले सर्व प्रस्ताव एकत्रित करुन शासनास पाठवावे. सदर समितीने महिन्यातून किमान एक बैठक घ्यावी. सदर समितीने प्रत्येक महिन्याच्या पहिल्या आठवडयात बैठक बोलवावी व सदर बैठकीत मागील महिन्यात प्राप्त झालेल्या सर्व प्रस्तावांवर विचार करून शिफारशी राज्य

शासनास सादर कराव्यात. मागील महिन्यात प्राप्त झालेले सर्व प्रस्ताव हे चालू महिन्यात शासनास सादर होतील याची जबाबदारी समितीचे अध्यक्ष यांची राहील. आवश्यकता भासल्यास समितीने चक्रीय (Rotation) पद्धतीने नस्ती फिरवून प्रस्ताव मान्यतेबाबत निर्णय घ्यावा.

२.४) राज्यस्तरावर सर्व प्राप्त झालेल्या प्रस्तावांची रँडम तपासणी करण्यासाठी प्रधान सचिव (शालेय शिक्षण) हे योग्य व्यवस्था निर्माण करतील. यामध्ये संबंधित उपसचिव, अवर सचिव, शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) यांच्या कार्यालयाचे, विभागीय शिक्षण उपसंचालक कार्यालयाचे व शिक्षणाधिकारी कार्यालयाचे प्रतिनिधी यांचा समावेश करता येईल. पात्र शाळांच्या परवानगीची नस्ती शासनाच्या मान्यतेसाठी सादर करण्यात येईल व शासनाच्या मान्यतेने शाळांना परवानगी (LOI) देण्यात येईल.

२.५) **प्रथम मान्यता :**

२.५.१) नविन शाळा परवानगी तसेच विद्यमान शाळेचा दर्जावाढ करीताचे परवानगी बाबतचे प्रस्ताव / अर्ज संस्थांकडून वरील ऑनलाईन प्रणालीत संस्थांनी भरावे. प्रस्ताव / अर्ज संपूर्ण भरण्यात आल्यावर लगेच त्यास युडायस कोड संगणक प्रणालीव्दारा देण्यात यावा. यापुढे या युडायस क्रमांकाप्रमाणे प्रथम मान्यतेची स्थिती समजेल.

२.५.२) प्राथमिक व उच्च प्राथमिक शाळा : शासनाकडून LOI प्राप्त झाल्यावर बालकाचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा अधिकार अधिनियम २००९, नुसार सर्व अटी पूर्तता करुन शाळा सुरु करण्याचा प्रस्ताव संबंधित शैक्षणिक संस्थेने शिक्षणाधिकारी (प्राथमिक) यांच्याकडे सादर करावा. पूर्ण प्रस्ताव प्राप्त झाल्यापासून १५ दिवसांच्या आत शिक्षणाधिकारी (प्राथमिक) यांनी प्रथम मान्यता दयावी. प्रथम मान्यता दिल्यावर ती संगणक प्रणालीत दिसेल अशी व्यवस्था असावी.

२.५.३) माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळा : LOI प्राप्त झाल्यावर शासनाने विहित केलेल्या सर्व अटी पूर्ण करुन शाळा सुरु करण्याचा प्रस्ताव संबंधित शैक्षणिक संस्थेने शिक्षणाधिकारी (माध्यमिक) यांच्याकडे सादर करावा. पूर्ण प्रस्ताव प्राप्त झाल्यापासून १५ दिवसांच्या आत शिक्षणाधिकारी (माध्यमिक) यांनी प्रथम मान्यता दयावी. प्रथम मान्यता दिल्यावर ती संगणक प्रणालीत दिसेल अशी व्यवस्था असावी.

२.६) अर्ज घेण्याची प्रक्रिया सतत सुरु राहील.

२.७) सादर केलेला अर्ज त्रुटी पूर्ततेअभावी अर्जाच्या तारखेपासून ते एक वर्षाच्या

कालावधीपर्यंत अपूर्ण राहील्यास असे प्रस्ताव / अर्ज आपोआप रद्द होतील. अशा अर्जदारांना शाळा सुरु करावयाची असल्यास नव्याने प्रस्ताव /अर्ज सादर करावा लागेल.

२.८) वरीलप्रमाणे कार्यवाही सदर शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या तारखेपासून अंमलात येईल. संगणक प्रणाली शक्य तितक्या लवकर तयार करण्यात यावी. तथापि, कोणत्याही परिस्थितीत तीन महिन्यापेक्षा अधिक कालावधी लागू नये याची खबरदारी घ्यावी.

२.९) संगणक प्रणाली तयार होईपर्यंत सर्व प्रस्ताव आयुक्त (शिक्षण) महाराष्ट्र राज्य, पुणे यांचेकडे दाखल करण्यात यावेत.

**३. शैक्षणिक स्पर्धेस प्रोत्साहन देणे व स्पर्धेत न टिकणाऱ्या शाळा बंद करणे :**

३.१) महाराष्ट्र स्वयंअर्थसहायित शाळा (स्थापना व विनियमन) अधिनियम, २०१२ मधील निकष पुर्ण करणाऱ्या सर्व अर्जांनुसार वरीलप्रमाणे ठराविक कालावधीमध्ये शाळेस मान्यता देण्याची कार्यवाही करण्यात येईल.

३.२) शाळेची घनता २ किंवा त्यापेक्षा अधिक असलेल्या ठिकाणी शाळेस मान्यता देतांना शाळा २ वर्षाच्या आत ए ग्रेड मध्ये आणण्याची अट व २ पेक्षा कमी घनतेच्या ठिकाणी शाळेस ३ वर्षाच्या आत ए ग्रेड मध्ये आणण्याची अट विहित करण्यात येईल. ही अट पूर्ण न केल्यास शाळा बंद करण्याबाबत हलफनामा लिहुन घेण्यात येईल.

३.३) सर्व शाळा ए ग्रेड मध्ये येतील याकरिता राज्यातील प्रत्येक शाळेची, शाळा सिध्दी अंतर्गत स्वयं मूल्यमापन करणे व ते योग्य आहे याची शहानिशा करण्याकरिता दरवर्षी तपासणी करण्यात यावी. त्याप्रमाणे शाळा सिध्दी संगणक प्रणालीत तसेच युडायस संगणक प्रणालीत नोंद घेण्यात यावी.

३.४) शाळांच्या शाळा सूरु झाल्यापासून पुढील तीन वर्षाच्या पटांचे विश्लेषण करण्यात यावे व गुणवत्तेच्या अभावामुळे कमी पट झाल्याचे निषन्न झाल्याचे निदर्शनास आल्यास अशा शाळा बंद करण्यात याव्यात. कमी पटाच्या (कमी पट म्हणजे शिक्षण हक्क कायदयाप्रमाणे आदर्श पटाच्या एक तृतीयांश समजण्यात यावा) व सी ग्रेड पेक्षा कमी ग्रेडच्या स्वयंअर्थसहाय्यित शाळा बंद करण्यात याव्यात.

३.५) २०१६-१७ मध्ये स्वयंमूल्यमापनात ए ग्रेड प्राप्त केलेल्या जिल्हानिहाय शाळाची नावे संबंधित जिल्हयाच्या वृत्तपत्रात प्रसिध्द करण्यात यावीत. तसेच या शाळांचे शासकीय क्षेत्रिय यंत्रणेद्वारे प्रतिवर्षी मूल्यमापन करण्यात यावे.

३.६) शाळांचे त्रयस्थ यंत्रणेद्वारे बाहयमूल्यमापन करण्यासाठी निविदा मागविण्यात येतील व त्यातून त्रयस्थ यंत्रणा निवडण्यात येईल.

३.७) बाहयमूल्यमापनामध्ये ए ग्रेड प्राप्त करणाऱ्या शाळांची नावे पुढील वर्षापासून शेक्षणिक वर्षाअखेर जाहीर करण्यात येतील.

४. **स्वयंअर्थसहाय्यित कायदयाखाली या आधी मंजूर करण्यात आलेल्या शाळा:** या सर्व शाळांची यादी काढण्यात यावी व या खालीलप्रमाणे शाळांबाबत कार्यवाही करावी.

४.१) शाळा सुरु असल्यास

४.१.१) युडायस कोड घेतलेला असावा.

४.१.२) प्रथम मान्यता घेतलेली असावी.

४.१.३) शाळा मान्यता दिलेल्या ठिकाणी सुरु असावी.

वरील बाबी पूर्ण होत नसल्यास वरील आदेशानुसार शाळांनी ऑनलाईन अर्ज करावा. अशा शाळेस युडायस कोड व प्रथम मान्यता दयावी. परंतू शाळा मान्यता दिलेल्या ठिकाणी सुरु नसल्यास ती शाळा अनधिकृत ठरेल व अशा शाळेची मान्यता काढून घेण्याबाबत कार्यवाही करण्यात येईल.

४.२) परवानगी दिलेली शाळा सुरु नसल्यास -

४.२.१) परवानगीस १८ महिन्यापेक्षा कमी कालावधी झाला आहे अशा शाळांना, शाळा सुरु करण्याबाबत शिक्षणाधिकारी (प्राथमिक / माध्यमिक) यांनी नोटीस दयावी.

४.२.२) परवानगी देऊन १८ महिन्याचा कालावधी पूर्ण झाला आहे, अशाप्रकरणी सदर परवानगी आदेश शिक्षण उपसंचालक यांनी रद्द करावेत व संगणक प्रणालीत नोंद घ्यावी.

५. **अनधिकृत शाळा :** राज्यात बऱ्याच अनधिकृत शाळा असल्याचे निदर्शनास आले आहे. सदर शाळांना ऑनलाईन अर्ज मागवून युडायस कोड देण्याची व्यवस्था करण्यात यावी. युडायस कोड दिल्यानंतर, सदर शाळा बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा अधिकार अधिनियम, २००९ मधील/महाराष्ट्र स्वयंअर्थसहायित शाळा (स्थापना व विनियमन) अधिनियम, २०१२ मधील तरतुदींची पूर्तता करीत असल्यास अशा शाळांकडून अर्ज / प्रस्ताव मागवून या शासन निर्णयातील अ.क्र. २ प्रमाणे कार्यवाही पूर्ण करावी. मात्र शाळेने अर्ज / प्रस्ताव सादर न केल्यास अशा अनधिकृत शाळेविरुध्द बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा अधिकार अधिनियम, २००९ मधील तरतुदीनुसार उचित कारवाई करण्यात येईल.

६. **बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा अधिकार अधिनियम, २००९ मधील तरतुदींची पूर्तता न करण्याऱ्या शाळा** : बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा अधिकार अधिनियम, २००९ मधील तरतुदींची पूर्तता न करणाऱ्या शाळांना, त्या तरतुदींची यथास्थिती ६ महिने ते १ वर्षाच्या कालावधीत करण्याबाबत नोटीस देण्यात यावी. अशा शाळांनी त्या कालावधीत संबंधित तरतुदींची पूर्तता न केल्यास, बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा अधिकार अधिनियम, २००९ मधील तरतुदीनुसार शाळेची मान्यता काढण्याबाबत कारवाई करण्यात येईल.

७. **युडायस उपकोड :** राज्यातील बऱ्याच शाळांमध्ये एकाच युडायस क्रमांकाखाली अनुदानित , विना अनुदानित व स्वयंअर्थसहाय्यित तुकडया आहेत. तसेच एकापेक्षा अधिक माध्यमांच्या शाळा आहेत. अशा शाळांना यापैकी प्रत्येक उपघटक साठी युडायस उपकोड देण्यात यावा. अशा रितीने प्रत्येक प्रकारच्या तुकडया स्पष्टपणे कळतील याची व्यवस्था करण्यात यावी.

८. शासन परिपत्रक क्रमांक संकीर्ण-२०१७/प्र.क्र. ११६/एसएम-४ दिनांक २० जुन, २०१७ नुसार सर्व इंग्रजी माध्यमाच्या कायम विना अनुदानित शाळांना यापुढे स्वयंअर्थसहाय्यित शाळा असे संबोधण्यात यावे.

९. ९.१ **कमी पट :** कमी पट म्हणजे शिक्षण हक्क कायदयाप्रमाणे आदर्श पटाच्या एक तृतीयांशापेक्षा कमी समजण्यात यावा.

९.२ **शाळेची घनता :** इयत्ता १ ली ते ८ वी च्या शाळांसाठी शिक्षण हक्क कायदा २००९ प्रमाणे व इतर शाळांसाठी शासनाने वेळोवेळी ठरविलेल्या कमाल दूरी ज्या अंतर्गत प्राथमिक, उच्च प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळा उपलब्ध असणे आवश्यक आहे. एखादया घरातील मुलांसाठी विहित निकषाइतक्या अंतराच्या आत त्या-त्या प्रकारच्या जेवढया संख्येने शाळा उपलब्ध असतील त्यास शाळा घनता असे संबोधण्यात येईल.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१७०७१४१२३२०२९१२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Nand Kumar

Digitally signed by Nand Kumar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c98b875883e76c14d91ed7b89546e6c11e439cad32d7f5cff487862cc567ee39, serialNumber=dcd3577ebf0e05e2a8b57095c152dc6cfb37c2bb83da197788645dd8a362ebc5, cn=Nand Kumar
Date: 2017.07.14 12:32:57 +05'30'

**(नंद कुमार)**
**प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव,
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
३) मा. मंत्री, ( शालेय शिक्षण), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२ यांचे खाजगी सचिव
४) सर्व संसद सदस्य, महाराष्ट्र राज्य
५) सर्व विधानसभा / विधानपरिषद सदस्य, महाराष्ट्र राज्य
६) सर्व महानगरपालिका आयुक्त/मुख्य कार्यकारी अधिकारी
७) आयुक्त, (शिक्षण) महाराष्ट्र राज्य, पुणे
८) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय
९) राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई.
१०) शिक्षण संचालक, (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे.
११) शिक्षण संचालक, (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे.
१२) सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक
१३) सर्व शिक्षणाधिकारी (प्राथमिक/माध्यमिक)/सर्व शिक्षण निरिक्षक, बृहन्मुंबई/ सर्व मुख्याधिकारी, नगरपालिका
१४) सर्व कार्यासने, शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१५) निवडनस्ती (एसएम २)